**"उपजिल्हा रुग्णालय हिंगणघाट जि. वर्धा येथे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी आहार सेवेचे प्रलंबित देयके अदा करण्यास परवानगी देणेबाबत."**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२१/प्र.क्र.२५६/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑक्टोंबर, २०२१.

वाचा :

**१) सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक-ससंआसे/राज्यस्तर/कक्ष-३/टे-९/उजिरुहिगणघाट/कंत्राटी/आहारसेवा/प्रदे/लेपूमं/१३०८९-९१/२१ दि.१३.०८.२०२१**

प्रस्तावना :

उपजिल्हा रुग्णालय, हिंगणघाट जि. वर्धा येथे पुरविण्यात आलेलेल्या कंत्राटी आहार सेवेची माहे मार्च,२०१९ या कालावधीतील प्रलंबित देयके अदा करण्यास कार्येत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. या बाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :

उपजिल्हा रुग्णालय, हिंगणघाट जि. वर्धा येथे पुरविण्यात आलेलेल्या कंत्राटी आहार सेवेची माहे मार्च,२०१९ या कालावधीतील मे. विदर्भ युवक स्वयंरोजगार सेवा सहकारी संस्था, वर्धा या पुरवठादाराचे रु.१,०२,४९०/- इतक्या रक्कमेचे प्रलंबित देयके अदा करण्यास कार्येत्तर मंजुरी देण्यात येत आहे.

१) यापूर्वी देण्यात आलेल्या कार्यरंभ आदेशातील व करारातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदार संबंधित अधिकाऱ्याची राहील.

२) सदर प्रलंबित देयके अदा करतांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

३) सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी. याबाबतची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

४) सदर प्रस्तावारवरील खर्च मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य २२१० ०४१३ (१९-आहार सेवा) यामधून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३ विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला,उपविभाग - एक मधील अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व त्यात नमुद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२११३३११९०१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2021.10.28 16:19:53 +05'30'

**(रो.दि. कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, वर्धा.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. वर्धा.
८. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, हिंगणघाट.
९. निवडनस्ती (आरोग्य-३).